**पदसिध्द सदस्य, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, कोपरगांव, जिल्हा अहमदनगर यांना “कार्यालय प्रमुख” तसेच “आहरण व संवितरण अधिकारी” म्हणून घोषित करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**गृह विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक एमसीटी-२०१६/प्र.क्र.१२१/परिवहन-५**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : ०२ मे २०१७.

<u>वाचा</u> : १) जिल्हा व अति.सत्र न्यायालय, कोपरगांव यांचे पत्र क्रमांक ४५४/२०१७, दि. १०/३/२०१७.

**<u>प्रस्तावना :-</u>**

शासन अधिसूचना गृह विभाग क्रमांक एमसीटी-०८०५/१०६३/१३६/परिवहन-५, दिनांक २५/०७/२००६ अन्वये अपघाताच्या बाबतीतील नुकसान भरपाईसाठी ज्यामध्ये मोटार वाहनाच्या वापरामुळे व्यक्तींना मृत्यू किंवा शारिरीक इजा पोचणे किंवा एखाद्या त्रयस्थ व्यक्तीच्या मालमत्तेस हानी पोचणे किंवा दोन्हीही बाबतीतील दाव्यावर अधिनिर्णय देण्याच्या प्रयोजनार्थ राज्यातील सर्व जिल्हा व तालुक्याच्या ठिकाणी त्या महसुली परिक्षेत्रासाठी दर्शविण्यात आलेल्या क्षेत्रासाठी मोटार अपघात दावा न्यायाधिकरणाची स्थापना करण्यात आली आहे. तसेच राज्यातील सर्व जिल्हा व तालुक्याच्या ठिकाणी पदस्थापित केलेले जिल्हा न्यायाधीश, सह जिल्हा न्यायाधीश व अतिरिक्त जिल्हा न्यायाधीश व तदर्थ (Ad-Hoc) अतिरिक्त जिल्हा न्यायाधीश, त्यादर्जाच्या अधिका-यांशी समतुल्य असलेले सदस्य त्या पदाचा भार वेळोवेळी ग्रहण केल्याची समजण्यात येणारे, जिल्हा न्यायाधीश, सह जिल्हा न्यायाधीश व अतिरिक्त जिल्हा न्यायाधीश व तदर्थ (Ad-Hoc) व अतिरिक्त जिल्हा न्यायाधीश यांना त्या महसुली परिक्षेत्रासाठी मोटार अपघात दावा न्यायाधिकरणाची प्रकरणे हाताळण्याचे अधिकार प्रदान करण्यात आले आहेत. त्यांना “कार्यालय प्रमुख” तसेच “आहरण व संवितरण अधिकारी” घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

वित्त विभागाचा शा.नि.क्र. . विअप्र-२०१३/प्र.क्र. ३०/२०१३/विनियम, भाग - २, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये तसेच वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका-१९७८, भाग पहिला उपविभाग-एक ते पाच मधील उपविभाग-एक मधील अनुक्रमांक ३, नियम क्रमांक २ अन्वये प्रशासकीय विभागांना दिलेल्या अधिकारानुसार, जिल्हा व अतिरिक्त सत्र न्यायाधीश, कोपरगावं तथा पदसिध्द सदस्य , मोटार अपघात दावा न्यायाधिकरण,

कोपरगांव, जिल्हा अहमदनगर यांना "कार्यालय प्रमुख" तसेच "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर आदेश वित्तीय बाबींपुरतेच मर्यादित राहतील.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१७०५०२१६१९२७२२२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Kadam Dattatray Hanmant

Digitally signed by Kadam Dattatray Hanmant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7fee1bbc15b71aa23bf3ffa4e468df7492703428e9ad65c6cd79299927331e6f, cn=Kadam Dattatray Hanmant
Date: 2017.05.02 16:21:52 +05'30'

**(द.ह. कदम)**
कक्ष अधिकारी, गृह विभाग.

**प्रति,**

१. प्रबंधक, उच्च न्यायालय (अपिलेट शाखा), मुंबई, (पत्राने)
२. प्रमुख जिल्हा न्यायाधीश, कोपरगांव, जिल्हा अहमदनगर,
३. जिल्हा न्यायाधीश-१ व अतिरिक्त सत्र न्यायाधीश तथा पदसिध्द सदस्य , मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, कोपरगांव, जिल्हा अहमदनगर,
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर,
५. जिल्हा कोषागार अधिकारी, कोपरगांव,जिल्हा अहमदनगर,
६. उप कोषागार अधिकारी, कोपरगांव, जिल्हा अहमदनगर,
७. वित्त विभाग (विनियम/कोषा/व्यय-८), मंत्रालय, मुंबई,
८. निवड नस्ती (परिवहन-५).